**कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाचा सर्वसाधारण प्रवर्गाचा पहिल्या हप्त्याचा निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राफअ-२०२४/प्र.क्र. ८१/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १८ जून, २०२४

**संदर्भ:-**

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.एमआयडीएच/२०१४/प्र.क्र.८२/९-अे,दि. ३० मे, २०१४
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल, २०२४.
३. केंद्र शासनाच्या कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभागाची इंग्रजी F.No.15011/12/2023-MIDH, Dated: 28th May, 2024 चे पत्र.
४. संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांचे जा.क्र. मराफऔवमं/लेखा/पहिला हप्ता मागणी/१४४११/२०२४, दिनांक २९.०५.२०२४ चे पत्र.
५. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र:राफअ-२०२४/प्र.क्र.८१/९-अे, दिनांक ४ जून, २०२४.

**प्रस्तावना:-**

सन २०२४-२०२५ मध्ये राज्यात कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये रुपये २०८३३.३३ लाख एवढ्या निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तद्नंतर संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडून सर्वसाधारण प्रवर्गाचा पहिल्या हप्त्याचा निधी प्राप्त झाला आहे. या पार्श्वभूमीवर सर्वसाधारण प्रवर्गाचा पहिल्या हप्त्याचा मंजूर केंद्र हिस्सा व त्याला समरुप राज्य हिस्सा निधी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषि), पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१. राज्यात कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान सन २०२४-२०२५ मध्ये राबविण्यासाठी सर्वसाधारण प्रवर्गाचा पहिल्या हप्त्यापोटी मंजूर केंद्र हिस्सा रुपये १५७६.७५ लाख व त्याला समरुप राज्य हिस्सा रुपये १०५१.१६६६७ लाख असा एकूण रुपये २६२७.९१६६७ लाख (रुपये सव्वीस कोटी सत्तावीस लाख एक्याण्णव हजार सहाशे सदुसष्ट फक्त) एवढा निधी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषि), पुणे यांना वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या अभियानाकरिता वितरित करण्यात येणारा निधी कोषागारातून आंहरित करण्याकरिता लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषि), पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी खालील लेखाशिर्षांतर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२०२५ साठी मंजूर केलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागाविण्यात यावा.

| **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
|---|---|
| मागणी क्र. डी-०३,<br>२४०१-पीक संवर्धन<br>(००)(११९)-फलोत्पादन व भाजीपाला पिके<br>(०३)(३७)-कृषि उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (कें.पु.यो.)<br>**(केंद्र हिस्सा ६०%)** (सर्वसाधारण)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१ ९५६३) | मागणी क्र. डी-०३,<br>२४०१-पीक संवर्धन<br>(००)(११९)-फलोत्पादन व भाजीपाला पिके<br>(०३)(३४)-कृषि उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (कें.पु.यो.)<br>**(राज्य हिस्सा ४०%)** (सर्वसाधारण)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१ ४५०७) |

४. निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्तीचे तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर प्रकरणी संदर्भाधीन क्रमांक ५ अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतुदीप्रमाणे कार्यवाही करावी.

६. सदर आदेश वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं.-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल, २०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०६१८१४३३४७१६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2024.06.18 14:49:55 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालाचे सचिव, महाराष्ट्र राज्य.

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे अप्पर मुख्य सचिव.

३) मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
५) मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-४०० ०३२.
६) सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) प्रधान सचिव (कृषि), कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
११) आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन मंडळ, पुणे.
१४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
१५) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१६) सर्व विभागीय कृषी सह संचालक, महाराष्ट्र राज्य.
१७) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१८) सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१९) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
२०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२१) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
२२) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२३) सह संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई-३२
२४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२५) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन क्र. १४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२६) कक्ष अधिकारी (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२७) कक्ष अधिकारी (२-अे), कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
२८) निवड नस्ती ९-अे.